**ठाणे जिल्हयातील शहापूर तालुक्यात ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी पाणी आरक्षण मंजूरीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(५२८/१६)/सिंव्य (धो)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २९ /३/२०१७

वाचा :- १) कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे दि. १४/३/२०१७ चे पत्र
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००१/ (१५४/०१)/सिंव्य(धोरण) दि. २१ जानेवारी २००३.
३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४
४) शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/(४४/१५)/सिं.व्य.(धो), दि. १७/११/२०१६
५) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिं.व्य.(कामे), दि.१७/११/२०१६

**प्रस्तावना :-**

१.० संदर्भिय पत्र क्र.१ अन्वये कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद यांचेकडून ठाणे जिल्हयातील शहापूर तालुक्यातील ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी पाणी आरक्षण मंजूरीबाबत पाणी आरक्षणाचा प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत.या शासन निर्णयाच्या परि.२.२ अन्वये मा.मंत्री(जसं) यांच्या मान्यतेने ठाणे जिल्हयात शहापूर तालुक्यातील ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी ४.५५ दलघमी सन २०२१ पर्यत पाणी आरक्षणास भावली धरणातून मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

| संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय/कालवा नदीचे नांव | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) | सिंचन क्षेत्रात होणारी कपात(हे.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ठाणे जिल्हयात शहापूर तालुक्यातील ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना | घरगुती | भावली धरण ता.इगतपूरी, जि.नाशिक | ४.५५ | ४७१ |

२.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१३/(४१५/२०१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४ नुसार जिल्हा परिषदा/ ग्रामपंचायती/ नगरपालिका/ नगरपंचायती/कटक मंडळे या आर्थिक दृष्टया सक्षम नसल्याने त्यांच्याकडून पिण्याच्या पाणी आरक्षणापोटी सिंचन पुन:स्थापना खर्च घेण्यात येवू नये.

२. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १०००/(७१३/२००१)/सिंव्य (धो), मुंबई ३२, दि. ७/४/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३. शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५. महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि. २९/६/२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्पाटप्पाने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील.

६. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३२९१२०३३७३९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.03.29 12:05:28 +05'30'

**(न. गौ. बसेर)**
शासनाच्या अवर सचिव

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१०. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
१३. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,उत्तर महाराष्ट्र प्रदेश,नाशिक.
१५. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक
१६. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)